**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्या अंतर्गत सर्व विभागीय मंडळांतील गट "अ" आणि गट "ब" (वर्ग-१ व वर्ग-२) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

**गृहनिर्माण विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक: बदली-२०१९/प्र.क्र.११५/गृनिभू**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
३ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० मे,२०२२

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग, क्र. नियुक्ति २०१९/प्रक्र.६९(१)/गृनिभू, दि.१७.०७.२०१९.
२) शासन निर्णय सा.प्र. वि. क्र.एसआरव्ही-२०१४/ प्र.क.२६/१२,दि.३१.०१.२०१४.
३) शासन निर्णय सा.प्र. वि. क्र.एसआरव्ही-२०१४/ प्र.क.२६/१२,दि.१९.०१.२०१५.
४) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग, क्रमांक: बदली-२०१९/प्र.क्र.११५/गृनिभू, दि. २७.०५.२०२१.

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्या अंतर्गत सर्व विभागीय मंडळांतील (म्हाडा) गट "अ" आणि गट "ब" (वर्ग-१ व वर्ग-२) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांच्या नियतकालिक तसेच मुदतपूर्व व बदल्यांचे अधिकार दि.१७/०७/२०१९ च्या संदर्भांकित क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासनास आहेत.

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दिलेल्या निर्देशांचे पालन करण्यासाठी शासन सेवेतील गट-अ , गट-ब व गट-क मधील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याचा निर्णय संदर्भांकित क्र.२ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार गृहनिर्माण विभागाच्या दि. २७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्याअंतर्गत सर्व विभागीय मंडळातील गट-अ व गट -ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळाची स्थापना करण्यात आली होती. सदर बदल्या प्रस्तावित करतांना या विभागांतर्गत झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई गृहनिर्माण क्षेत्रविकास मंडळ व मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना मंडळ, मुंबई मध्ये प्रामुख्याने बदली होत असल्याने प्राधिकरण/ मंडळातील कार्यालय प्रमुखांना सदर नागरी सेवा मंडळावर घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने सदर नागरी सेवा मंडळामध्ये बदल करण्याचे प्रस्तावित होते.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्यांअंतर्गत सर्व विभागीय मंडळातील गट-अ व गट -ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळाची स्थापना यापूर्वी संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. सदर शासन निर्णय या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत असून खालीलप्रमाणे सुधारित नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यात येत आहे:-

**नागरी सेवा मंडळ (१)**

| | | |
|---|---|---|
| १. | अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव,गृहनिर्माण विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी/म्हाडा/प्रा. | सदस्य |
| ३. | मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण | सदस्य |
| ४. | मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण क्षेत्रविकास मंडळ | सदस्य |
| ५. | मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना मंडळ | सदस्य |
| ६. | अवर सचिव (गृनिभू), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय | सदस्य सचिव |

२. नागरी सेवा मंडळ (१), महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्यांअंतर्गत सर्व विभागीय मंडळातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करील.

३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार बदल्यांच्या प्रस्तावावर नागरी सेवा मंडळ (१) शिफारशी करील.

४. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०५२०१६३४१३०६०९ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LEMBHE ADITI ASHOK

Digitally signed by LEMBHE ADITI ASHOK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ceb5712400e1116fd269899721525355fdff0f1c9e88083ec7c5989cd8012199, pseudonym=B49A5EA513466592434F08BAF3686D085B1EF743, serialNumber=990DB0BB526B1091666DA553E7E0E30BE26640A64E18C3EA2EF4825D35D8EBC1, cn=LEMBHE ADITI ASHOK
Date: 2022.05.20 16:35:55 +05'30'

**(अदिती लेंभे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

२) मा. मंत्री ( गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०००३२

३) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

४) अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

५) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे (पुर्व), मुंबई-४०० ०५१

७) मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुर्नरचना मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

८) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

९) सर्व मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळ

१०) सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

११) निवडनस्ती, गृनिभू कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२